ई-साहित्य प्रतिष्ठान

वर्ष तिसरे, अंक – ११ वा,

१४ मार्च २०११



**अतिथी संपादक**

सुजीत शिंदे( मुंबई)

**संपादिका**

सोनाली घाटपांडे (पुणे)

**सह संपादक**

भारती सरमळकर (मुंबई)

स्वप्ना कोल्हे (नाशिक)

सचिन काकडे (मुंबई)

शशिकांत रणवरे (मुंबई)

सारंग भणगे ( पुणे )



सहजच चॅनेल सर्फ करताना अवचित एक गाण समोर आल

"मेरा कुछ सामान तुम्हारे पास पडा है" ……….

आशा भोसलेंचा आवाज आणि गुलझार साहेबांचे शब्द मनात घर करून राहिले.

'आठवण', कधी मनावर अलवार मोरपीस फिरवणारी

तर कधी हाताला बोचलेल्या काट्याने डोळ्यात पाणी आणणारी.

तुम्ही म्हणता की आठवण अशा व्यक्तीची किंवा वस्तूची येते जिला विसरणं शक्य होत.

पण आम्ही म्हणतो आठवण कुणाचीही आणि कसलीही येते, मग ते ड्रॉवरमध्ये ठेवलेले जुने फोटो असोत,

कॉलेजची शेरो शायरी आणि चित्रांनी भरलेली एखादी वही असो,

घराच्या अंगणात जपून ठेवलेली जुनी गाडी असो

अथवा आधुनिक सोयींनी युक्त असा पेनड्राईव्ह किंवा हार्ड ड्राईव्ह.

कधी जुनी पत्र, जुन्या वस्तू पाहून मन अचानक भरून येत आणि वा-याचा एका झोताने

टेबलावरचे कागद अस्ताव्यस्त व्हावेत

तस काहीसं मनाच होत …………आणि आठवणींचा मनात पिंगा सुरू होतो .

अशा वेळी अवचित एखादी जुनी रेकॉर्ड हाताशी लागली तर, एक कॉफीचा कप आणि ती रेकॉर्ड

इतकीच सोबत पुरेशी होते.

Every Cloud has silver lining असं कितीही म्हटलं तरी जुन्या वस्तू, जुने मित्र

आणि जुन्या आठवणी यांना मात्र golden च lining असते बरं का !

काही गोड, काही कडू ……… काही खट्ट्या - मिठ्या आठवणींचा खजिना आम्ही घेऊन आलोय.

खास तुमच्यासाठी काही ख़ास आठवणींसोबत



मी सुजीत शिंदे (धवल ध्रुव)

१२ वी नंतर लगेचच काही कोर्स करून मी कामाला लागलो. नेट्वर्क इंजिनियर, सिस्टीम प्रोग्रामिंग करत करत सॅप कंपनीत नेटवर्क इंजिनियर म्हणून कार्यरत आहे.

कवितेचा आणि माझा संबंध तसा फार जुना, अगदी शाळेत ४थी मध्ये असताना पहिली लिहीली गेली................... कविता आणि मग जोम वाढ्तच गेला . मग मध्ये एकदा शाळेतल्या बाईंनी अगदी टोपण नावचं दिले ध्रुव.

होता होता त्याचे धवल ध्रुव झाले , त्याच नावाने मग पुढे लिहू लागलो.

लेखकांमध्ये व्यंकटेश माडगुळकर फार आवडते, त्यांची प्रवास वर्णने , जंगल सफारी , आणि व्यक्तिवेध फार भावला. इथूनच प्रेरणा घेऊन कथा लिहू लागलो.

इथवर ओर्कुट वरील संदीप खरे कम्युनिटी पाहिली तिथेच काही कवी मित्र भेटले. मग लगेचच काव्यांजली आणि मराठी कविता ह्या कम्युनिटीत आपोआप सामावून गेलो.

खर तर पुस्तकी जगापेक्षा ह्या नेटवर इतका काही शब्द खजिना सापडला की एखादी दिर्घिका सापडावी असे वाटले आणखीन काय सांगू. .............

इतकेच की

"कधी लिहाया लागलो कळलेच नाही

का लिहाया लागलो तेही कळले नाही "

कवी होणे हातावरच्या रेषेत नसते लिहीलेले

- धवल ध्रुव

## मरीन लाईन अणि मी

असेच रोज भेटतो

आम्ही सारे

मी , वारा , समुद्राचे पाणी आणि तो मित्र

तो असताना सारेच कसे हसरे असते

तो मावळल्या नंतर

सारेच कसे हरवून जाते

मग रात्रीचा तो समुख सादर

आणि चांदण्याही निरंतर

बरचं काही दिसत असते आणि

आणि काही दिसत नसते

अंधारलेल्या कोप-यात

तसे आपण पहायचे नसते

एक सिगारेट घेऊन

उगाच पेटवायची

अन द्यायची फेकून पाण्यात

जशी ती कधीच पेटली नव्हती

अशीच लागलेली आस कुणाची

उधळून द्यायची पाण्यात

जशी ती कधीच लागलीच नव्हती

मुन्नाला तर तिथे ॲडमिशन मिळाले

त्या मुन्नाभाई पॉईंटवर (मरीन लाईन एन्ड)

तुम्हाला काय मिळाले ????

**-सुजीत शिंदे (धवल धृव)**





# MAG 1848

MAG 1848 मागची सीट
पोटाला घट्ट धरलेला हात नीट
नेहमीचा वास बाबाच्या शर्टाचा
नीट बस रे मन्या झोपलास का ?
बाबा गेला गाडी माझी झाली
माग़ाच्ही सीट कायमची सुटली
मागच्या सीटशी थबकतो आजही
आठवते ‘मन्या’, शर्टचा वासही
MAG 1848 बाबाचा साथ
हा स्कूटर नव्हे मायेचा हात
एक घरचा सदस्य खूप जुना
जप तो माझ्या बाबाच्या खुणा

**तुषार जोशी, नागपूर**

-

## कॉलेजची ती जुनी वही

कॉलेजची ती जुनी वही
कधी धरावी घट्ट हृदयाशी
घेत मग तो जुनाट गंध
खेळत बसावे आठवणींशी

प्रत्येक पानाशी क्षणभर थांबावं
त्याच्याशी निगडीत सारं आठवावं
अन आपला तो बावळेपणा
नकळत स्वतःशीच हसावं

एखाद्या पानावरचं सरांच व्यंगचित्र
एखाद्या पानावरची शेरो शायरी
एखाद्या पानावरची ग्राफिटी
अन एखाद्या पानाची तिला पाठवलेली चिठ्ठी

एखाद्या पानावरचा मनापासून केलेला अभ्यास
एखाद्या पानावरचे क्षण काही उदास
एखाद्या पानाचा मरलेला बाण
आणि एखाद्या पानावरची कविता छान

क्षणभर त्या आठ्वणीत जगावं
जुनं सारं आठवून पहावं
टिपत पापण्यातले पाणी मग
वर्तमानात हलकेच परतावं

\- अनिल विहाणी





# काल घरातून माझी जुनी ब्रिफकेस गेली

काल घरातून माझी जुनी ब्रिफकेस गेली
चोरही पाहून वरमला असेल
म्हणत असेल आज दरिद्राच्या घरात चोरी झाली

पाहिले तर त्यामध्ये काहीच नव्हते आणि
पाहिले तर माझी जिंदगी त्यामध्ये साठलेली
एक जुनी जीन्स होती
पायाखाली येऊन येऊन तळव्याजवळ फाटलेली

एक तुझं रेखाचित्र होतं तुला आठवताना मी काढलेलं
कोणालाही पटलं नसलं तरी
मला ते तंतोतंत तुझ्यासम भासणारं
मी डोळ्यात बघताच माझ्याकडे पाहून हसणारं

आणि एकही दिवस विसर पडला तर
नाक मुरडून रूसणार
तू स्वतः कधी बोलली नसशील
येवढ ते चित्र मजसवे बोलायचं

येवढ मात्र नक्की की
त्याला पाहून छातीत काहीतरी सलायचं

तु दिलेला पेनही आज गेला
त्या पेनाने मी कितीतरी कविता तुझ्यासाठी लिहीलेल्या
किंवा असं म्हण की त्या पेनाला पाहून मला त्या सुचलेल्या

त्या सोबत गेल तुझं ते एकुलतं एक पत्र
तू रात्री जागून लिहिलेल
तुझ्या प्रेमाने काठोकाठ भरलेलं
कित्येकदा माझ्या छातीला लागून निजलेलं
वाचताना नकळत अश्रूचा थेंब पडून थोडसं भिजलेलं

कधीही चोरला जाणार नाही असा
तुझ्या आठवणींचा ठेवा मी डोळ्यात भरला आहे
काल आठवणींचे शरीर चोरीस गेले
आत्मा मात्र जसाच्या तसा माझ्याकडे उरला आहे

**दिपक इंगळे**

## रेकॉर्डस

जुनी सगळी गाणी
रेकॉर्डस तशा न झिजलेल्या
काढतो अचानक
अडगळीतून
चक्रावतो ......अरे !
ही गाणी ऐकायचो आपण ?
आणि गुणगुणायचो दिवसभर ?
या रेकॉर्डस वाटल्या आपल्याला
जपून संग्रही ठेवण्याच्या लायकीच्या ?

की बदलली आपलीच लायकी आणि लायकींग ?
काळानुसार सारंच बदलतं
पडतं
नविन उभही रहातं
(यालाच प्रगती म्हणतात
आईनस्टाईनचे सिध्दांत
इथंही लावून पहायला हरकत नाही )

पण यार मुळांना नाही सोसत बदल
मातीतुन उपटून काढली तरी
मूळ मातीशी राखतात ती ईमान

झाड मरतं यार अशानं
झाडवं मरत उभं !

**नाम गुम जायेगा**





**एक पत्र**

आज उघडून बसले होते
सगळी जुनी पत्रे
तुझी, माझी, काही जपलेली,
न पाठवलेली, काही फाडलेली

कधी डोळे भरून येत होते
कधी रागने लाल होत होते
कधी मी उदास होत होते
कधी हरवून जात होते

एक पत्र तुझं मला पाठवलेलं
एक असच जुन्या मैत्रिणीचं
पहिल्यांदा माहेरी गेल्यानंतर
एकटं वाटत असताना लिहीलेलं

तसचं तुझ्यासोबत आल्यानंतर
सखी ने पाठवलेले खास बंध

असचं एक पत्र हाती आलं
खूप खोल दडवून ठेवलेलं
माझ्या बाबांच

लग्नानंतर आलेल पहिलं पत्र
खुपसं काळजी करणारं
तेवढचं धीर देणारं
खूप न सांगता खुप काही सांगणारं

जपुन  ठेवलय मी आज ही
आज तेच पत्रं म्हणजे
माझे बाबा झालेय
मला सोडून गेलेले पण तरीही
आजही सतत सोबत असणारे

**प्रसन्ना खडीकर**

## जुने स्क्रॅप

आज सारे जुने स्क्रॅप वाचत होते
किती काटे अंगावर येत होते
नविनच झालेल्या ओळखी
नविनच जुळेलेली नाती
येत नसलेल्या पीसीवर
अवचित फिरणारी बोटं
आणि नविन लोकांशी जुळलेलं नविन साटलोट
कुठे केलेली थट्टा
कुठे शाब्दीक चकमक
कुठे उगा केलेली
फालतुक बकबक
सादांचे प्रतिसाद
थ्रेडवरचे तात्पुरते वाद
सारं काही आठवल
अगदी नुकतं घडून गेल्यागत
पहिल्या पानापासून
शेवटच्या पानापर्यंत
सारे लोभसवाणे होते
पुन्हा पुन्हा मला ते
जुन्यात ओढ़त होते
बर वाटलं
कधीतरी हे ही चाळायला हवय
जुन्या डायरीवर भाळायला हवय

**पल्लवी उन्हाळे (वृथा)**





# मला नाही आठवत नाही

मला नाही आठवत नाही
मी लिहीणार नाहीये
भूतकाळ प्रिय शत्रू माझा
त्याला पुन्हा पाहणार नाहीये

मला नाही आठवत नाही
परत नाजूक भावनांशी खेळणार नाहीये
जे घेवून गेले सर्वस्व माझे
ते वादळ आठवणार नाहिये

मला नाही आठवत नाही
माहीतेय हे जीवन पुन्हा मिळणार नाहीये
माझी सुखे तुमची असतील पण
माझी दुःखे तुम्हाला छळणार नाहीये

खोटे तर खोटे तरीपण खरे आहे
मला नाही आठवत नाही
मी लिहीणार नाहीये

**तनवीर सिद्दीकी**

मी बालक जेव्हा होतो, हातात खुळखुळा होता
टांगते खेळणे वरती, इतकाच मामला होता

मी रांगू लागलो जेव्हा, बाहुली मिळाली छान
आवडे मला ती भारी, हलेना तिच्याविन पान

मी चालाया लागून, लागलो उड्या माराया
मज कौतुक वाटे मोठे, ते सर्वांना दावाया

मी कुमार जेव्हा होतो, रात्रंदिन भवरा फिरवी
मी पतंग, गोट्या खेळे, जिंकताच शेखी मिरवी

मी किशोर असताना हो, मी छंदामाजी जडलो
जमविली तिकीटे, नाणी, प्रेमात कथांच्या पडलो

तारूण्य माझीया दाड़ी, वादळापरी मग आले
रमताच रमा-रमणीत, सर्वस्व तेच मम झाले

खेळणी बदलती होती, किती आली आणिक गेली
वाटती सत्य आत्ताची, ती मजा जुन्याची सरली

रिझवाया मजला का हे, कधीच पुरे ना पडले ?
चाखुनी जाहला चोथा, रसगंध त्यातले उडले

या जगतातील वस्तुंचे, खेळण्याहूनी ना मोल
जे सत्य अंतरी आहे, त्याच्या संगे तू डोल

**अहं ब्रह्मास्मी**





## माझ्याकडे ८ जी बी हार्ड ड्राईव्ह आहे !!

माझ्याकडे ८ जी बी हार्ड ड्राईव्ह आहे !!
तो मी माझ्या जीवापेक्षा जास्त जपला आहे
त्यात काही आठवणी बसल्या आहेत घर करुन

काही घरच्यांच्या काही मित्रांच्या
खुपश्या तिच्या आणि काही अश्याच वळणावरच्या
मनावर मळभ साचते आणि जराश्या आठवणी विरळ होतात
तो कप्पा उघडला की पुन्हा त्या आठवणी ताज्या होऊन मनाला जपतात

माझ्याकडे ८ जी बी हार्ड ड्राईव्ह आहे !!
तो मी माझ्या जीवापेक्षा जास्त जपला आहे

त्यात काही कविता आहेत काही माझ्या काही मित्रांच्या
मैत्रीवर , प्रेमावर भावनांवर आणि काही जीवनाच्या प्रश्नावर
वाचताना कधी डोळ्यांच्या कडा ओलावतात तर कधी हास्याची लकेर उमटते

काहींच्यातील शृंगार तिची आठवण करून देतो
तर काही बोलांनी अजूनही मनाला कापरे सुटते
माझ्याकडे ८ जी बी हार्ड ड्राईव्ह आहे !!
तो मी माझ्या जीवापेक्षा जास्त जपला आहे

कधी कधी तो कप्पा उघडवासा नाही वाटत
कारण मन भरून येते त्यातील तिचे हास्य पाहून
लग्नातले तिचे ते फोटो तिचे मंगळसूत्र
त्या सप्तपदी , ते मंत्रांचे उच्चार सारे पाहून
पुन्हा तिच्या आठवणी जाग्या होतात
सारे डोळ्यासमोरून झरकन निघून जाते

एक क्षणाचे काही हास्य आयुष्यभर मनात घर करते
तिच्या सहवासातले ते दोन क्षण मला आयुष्यभर साथ देतात
कोणा तिस-याची मला गरज भासत नाही
कितीही लांब गेली तरीही ती या आठवणींमुळे
माझ्या मनात सदैव प्रेमाची साद गुंजत राही

माझ्याकडे ८ जी बी हार्ड ड्राईव्ह आहे !!
तो मी माझ्या जीवापेक्षा जास्त जपला आहे

**पराग नेवे (प्राग)**

# पाषाणखंड

ह्या इथल्या मातीचा दर्प कोवळा होता
इथल्या वा-यांचे वाहणे ही एक सोहळा होता

## (प्रवेशद्वार)

ह्याच बुलंदी दरवाज़ावर दगडी पहारे असतील
कित्येक तुफाने हताश थकून परतले असतील
आज भिंतीला टेकून ना सामर्थ्य ना सहारा
आता वा-याची झुळूक करकरे दरवाज़ा

## (कुलदैवत मंदीर)

ह्याच मंदिरी कधी एक दिवा तेवत होता
इथला स्वामी कधी उंची वस्त्रे लेवत होता
धुळी जाळ्यांचीच वस्त्रे ना गंध नैवेद्याचा
पादुका पाचोळ्यांच्या माथी मुकुट घरट्यांचा

## (सभागृह)

ह्या सभेने उध्वस्तण्या डावपेच आखले असतील
ह्याच सभेत कित्येक शिरे झुकली असतील
उत्तान वाकलेले आज मातीला स्वाधीन
हिच सभा आज डावपेचांच्या आधीन

## (विश्रामकक्ष)

ह्याच दालनी पाकळ्या कुंडलात कुजबुजल्या होत्या
ह्या पडध्याच्या आड अत्तरी राती सजल्या होत्या
ना कुजबुज आज ना अत्तरी फवारी
आत पडद्याच्या आड फक्त मातीची दिगारी

## (जलक्रिडा हौद)

ह्याच तळ्यात असेल भिजले जलराण्यांचे
अवखळणे
ह्याच चि-यात असेल थिजले नुपूरांचे खळखळणे
आज़ तळ्याच्या तळाला ना टिपभर पाणी
तरी कोपहिरवा यात एक कोंब अनवाणी

## (शस्त्रागार)

इथल्या दगडात असेल घुमणे शस्त्रांचे
खणखणणे
याच मातीत असेल भिजले घामांचे निथळणे
आता दगडी आवाज़ वा-याचाच ज़ुना
मातीची धुळधाण जपता पाऊलांच्या खुणा

## (छत)

ह्याच छताच्या चंद्राला ता-यांचे कोंदण होते
ह्या वाड्याला एक प्रतिभेचे गोंदण होते
आता नभाच्या आडून छत देखवत नाही
ज़ुन्या घावांचे नवे गोंदण लपवत नाही

ह्या वाड्याच्या अंगणी स्वर सुर होत होते
खंड पाषाण वैभवी गुणगीत गात होते
आता आलिशान वाड्यात भग्न भेसूरच गाणे
गाणी गुणगुणताना चाळी काळाचीच पाने

**प्राजक्त देशमुख**

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास 'नेटाक्षरी' जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणा-या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय. आमच्या रसिक वाचकांच्या ह्याच उत्स्फुर्त प्रतिसादामुळे नेटाक्षरीने १००चा पल्ला गाठला. नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ८०००० हून अधिक मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्या व्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करुन वाचणा-यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतु असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा. आपल्या सारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

## ई-साहित्य प्रतिष्ठानची इतर विनामूल्य ई-नियतकालिके

ई-स्टाव, स्वरनेटाक्षरी ऑडियो अल्बम, बालनेटाक्षरी

### प्रसिद्ध झालेली ई-बुक्स

- **टल्लीची शाळा**
- **मकरंदच्या त्रिवेण्या**
- **ग्रेव्हयार्ड लिटरेचर**
- **चार क्षण**
- **तो आणि ती**
- **प्रियेचे अभंग**
- **देशी दारुचे दुकान-3D**

### प्रसिद्ध झालेली ई-बुक्स

- ई-शाळा
- तो, मी आणि सिगरेट
- मोरया
- लोकल गोष्टी
- मीरा अनुवाद
- ओथंब
- सावळ्या मुलीची गाणी
- सईची वही

वरील ई-बुक्स विनामूल्य मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी संपर्क करा

esahity@gmail.com

नेटाक्षरीचा हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी,सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी संपर्क करा

netaksharee@gmail.com

आता ई-साहित्यची वरील सर्व ई-प्रकाशन उपलब्ध आहेत सी डी मध्ये "५० रुपयांत १११ ई-पुस्तके"

संपर्क करा ९८६९६७४८२०

**www.esahity.com**